महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेकरिता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत. (लेखाशिर्ष २२१०जी८६१)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र.३९/अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २१ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४

२) सार्वजनिक आरोग्य विभागाची नस्ती क्र.मफुयो-२०२४/प्र.क्र.१३०/आरोग्य-६

**शासन निर्णय :-**

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेअंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ करिता २२१०जी८६१ या लेखाशिर्षाखाली रु.२०९७५.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली आहे. या अनुषंगाने सार्वजनिक आरोग्य विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेतंर्गत लाभ देण्यासाठी हमी तत्वावरील दाव्यांची अदायगी करण्यासाठी २२१०जी८६१ या लेखाशिर्षाखाली ३१ सहायक अनुदाने रु.२७,२८,४४,०००/- ( अक्षरी रु. सत्तावीस कोटी अठ्ठावीस लाख चव्वेचाळीस हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलबध करुन दिलेलया तरतूदीतून झालेलया खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व सार्वजनिक आरोग्य विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ रोजीच्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५.०७.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वयेन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.७०९/व्यय-१४, दि.२५.०७.२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२११११४६४९४४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MADHURI RAMESHRAO DESHMUKH

Digitally signed by MADHURI RAMESHRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b2ebfb3236cc858f1bfa78f3de6498d4fcfce5d96dfebef6e55e5ffee43058f7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=819CF6BD582283F10DDE4E19D8E7882D9CAB87DE4E1382FE0566D47572F14290, cn=MADHURI RAMESHRAO DESHMUKH
Date: 2024.08.21 12:02:08 +05'30'

**( माधुरी देशमुख )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) सर्व जिल्हाधिकारी
४) महासंचालक, आरोग्य सेवा, मुंबई
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-६), मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग